**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील उपअभियंता (यां) संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-०२१९/प्र.क्र.३२/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २२ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :-

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१३/प्र.क्र.२४९/पापु-१५, दिनांक ३१ जुलै, २०१४
३) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** प्रशासन/ आस्था ५/ परि.काला.समा/उपअभियंता(यां)/प्र.क्र.७९/२०१९, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१९.

प्रस्तावना :-

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “उपअभियंता (यांत्रिकी)” या पदावर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन आदेशान्वये दोन वर्षांच्या परीविक्षा कालावधीकरीता काही अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत. या नियुक्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार “उपअभियंता (यांत्रिकी)” या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून उपअभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने व तशी शिफारस संचालनालयाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये केलेली असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित “उपअभियंता (यांत्रिकी)” म्हणून स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील खालील “उपअभियंता (यांत्रिकी)” यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून त्यांचा परीविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | परिविक्षाधीन उपअभियंता (यांत्रिकी) यांचे नाव | उपअभियंता (यांत्रिकी) पदावर रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | उप अभियंता (यांत्रिकी) पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. रणजीत नामदेव काळे | २२/०८/२०१४ | ०७ दिवस | २८/०८/२०१६ | २९/०८/२०१६ |
| २ | श्री. संदीप विश्वास भुसे | ०२/०८/२०१४ | १० दिवस | ११/०८/२०१६ | १२/०८/२०१६ |
| ३ | श्री. खालिद अहमद मुस्तफा नदाफ | १२/०८/२०१४ | ०८ दिवस | १९/०८/२०१६ | २०/०८/२०१६ |
| ४ | श्री. गणेश सुर्यकांत ढेरे | ०१/०८/२०१४ | निरंक | ३०/०७/२०१६ | ०१/०८/२०१६ |

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, उक्त उपअभियंता (यांत्रिकी) यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/ आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 201902211554441728 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2019.02.22 13:23:30 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व संबंधित)
८. सह संचालक (अभियांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
९. वरिष्ठ खोदण अभियंता (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१०. उपअभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व संबंधित) (संचालनालयामार्फत)
११. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५).